कुस्ती खेळाचा विकास यासाठी आर्थिक सहाय्य देण्याकरिता निधी वितरित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

## शासन निर्णय क्रमांक : निविप्र ४०१९ /प्र.क्र १०० /क्रीयुसे -२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : २७ मार्च, २०२०

वाचा

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र.राक्रीधो १०९६/प्र.क्र.३३०/क्रीयुसे-२,दि.३१ जुलै,१९९७.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र. क्रीडायो २०१२/प्र. क्र. ६४/क्रीयुसे-२दि. २१.१२.२०१२
३. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक अनुवि ४९१९/ प्र.क्र.३२/अर्थ, दि. १८ मार्च, २०२०.
४. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं - २०१९ / प्र.क्र ९२ / अर्थ-३, दि.१३.०३.२०२०
५. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. निधी वितरण/कुस्तीखेविआस/ २०१९-२०/का.६/४३३४, दि. १४.३.२०२०

प्रस्तावना -

कुस्ती कलेचा विकास व्हावा या दृष्टीने कुस्तीगीरांना मानधन देण्याची योजना संदर्भ क्र. १ अन्वये लागू करण्यात आली आहे. यामध्ये संदर्भ क्र. २ येथील दि. २१.१२.२०१२ च्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली आहे. या योजनेसाठी सन २०१९-२० मध्ये रु.१२०.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित आहे. सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील वरिष्ठ गट फ्रीस्टाईला गादी विभाग या प्रकारातील सहभागी कुस्तीगीरांना १२ महिन्यांचे मानधन रक्कम देणे बाकी होते. त्यानुसार, सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील मंजूर अर्थसंकल्पीय रक्कमेतून सन २०१८-१९ मधील वर नमूद प्रकारातील सहभागी कुस्तीगीरांना मानधन देण्यासाठी रु. ३३.०८ लक्ष इतका निधी संदर्भ क्र. ३ येथील दि. २६ नोव्हेंबर, २०१९ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केला आहे. सन २०१९-२० मधील प्राविण्य प्राप्त व सहभाग कुस्तीगीरांना मानधन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

सन २०१९-२० या वर्षाकरीता कुस्ती खेळाचा विकास यासाठी आर्थिक सहाय्य देण्याकरिता अर्थसंकल्पित रु.८६.९२ लक्ष ( रुपये-शहाऐंशी लक्ष ब्यान्नव हजार फक्त ) इतका निधी वितरित करण्यास व सदर निधी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्रमांक: ई-३, २२०४-क्रीडा व युवक सेवा- १०४ क्रीडा व खेळ (०८) खेळ व खेळाडूंना सहाय्य (०८) (०१) कुस्ती खेळाचा विकास यासाठी आर्थिक सहाय्य (२२०४ १६४९), ३४ शिष्यवृत्त्या/विद्यावेतने" या लेखाशिर्षाखालील चालू वित्तीय वर्षामध्ये मंजूर

तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. ८.७.२०१९ व दि.१३.०३.२०२० च्या परिपत्रकातील सूचनानूसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त (क्रीडा )यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३२७१२५६५८८९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700f e62cba2439a81b4be4, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2020.03.27 16:21:47 +05'30'

**( स्वा. म. नानल)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण )यांचे खाजगी सचिव
२) मा. राज्यमंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांचे खाजगी सचिव
३) मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, (क्रीडा संचालनालयामार्फत).
८) सर्व उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, (क्रीडा संचालनालयामार्फत).
९) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी, ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१०) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती, क्रीयुसे-२